**फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरून शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून औषधनिर्माणशास्त्र पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेश क्षमतेत वाढ करण्यास करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२४/प्र.क्र.१७८/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० जुलै, २०२४.

**वाचा** : १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.मान्यता-२०२३/प्र.क्र.५७/तांशि-४, दि.३१.०७.२०२३
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/पीसीआय-मान्यता/२०२४/४७२, दि.११.०७.२०२४.

**प्रस्तावना** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून उपरोक्त वाचा क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णूपुरी, नांदेड या संस्थेमध्ये ३ नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम प्रत्येकी ६ प्रवेश क्षमतेसह सुरु करण्यास मान्यता देण्यात आली होती. शैक्षणिक वर्ष २०२३-२४ ची प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी सदर ३ अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेत वाढ केली आहे. त्यानुसार उक्त अभ्यासक्रमांना वाढीव प्रवेश क्षमतेसह शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांनी वाचा क्र.०२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ करिता दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, उपरोक्त वाचा क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णूपुरी, नांदेड या संस्थेमध्ये ३ नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम प्रत्येकी ६ प्रवेश क्षमतेसह सुरु करण्यास मान्यता देण्यात आली होती. शैक्षणिक वर्ष २०२३-२४ ची प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी सदर ३ पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेश क्षमतेत वाढ केली आहे.

फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ मध्ये दिलेल्या सुधारित मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्यानुसार, सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णूपुरी, नांदेड या संस्थेतील औषधनिर्माणशास्त्र पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेत, शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून पुढील तक्त्यातील स्तंभ क्र.०४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे वाढ करण्यास, खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अभ्यासक्रम | शैक्षणिक वर्ष २०२३-२४ करिता शासन निर्णय दि.३१.०७.२०२३ अन्वये दिलेल्या शासन मान्यतेनुसार प्रवेश क्षमता | शैक्षणिक वर्ष २०२३-२४ करिता सुधारित मंजूर प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | M.Pharm. Pharmacognosy | ०६ | १५ |
| २ | M.Pharm. Pharmacology | ०६ | १५ |
| ३ | M.Pharm. Regulatory Affairs | ०६ | १५ |

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता ही कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) सदर अभ्यासक्रमांना वाढीव प्रवेश क्षमतेसह, फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांची शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिता मान्यता Extension of Approval (EoA) असणे आवश्यक राहील.

३) वाढीव प्रवेश क्षमतेस, शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून मान्यता देण्यात येत असली तरी, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या प्रवेश क्षमतेनुसार सदर अभ्यासक्रमांचे प्रवेश करणे आवश्यक राहील.

४) अन्य अटी व शर्ती वाचा क्र.०१ येथील दि.३१.०७.२०२३ च्या शासन निर्णयात नमूद केलल्याप्रमाणे लागू राहतील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संस्थेवर बंधनकारक राहतील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७३०१५२१२८२९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=d203fe3b025c07c7692f5c23a43a4905f46cdde0ef54f3944caf1c620a5bc64e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BF4EB2A0C007D6CA5A25B0E564499E5FF904468E1A96902315E3E67299424039, cn=SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2024.07.30 15:36:24 +05'30'

**( शहाजहान मुलाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.
३) सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
५) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवड नस्ती/तांशि-४